**खावटी कर्ज वाटप योजना सार्वजनिक वितरण व्यवस्थेमार्फत धारणी (मेळघाट), एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्पामध्ये प्रायोगिक तत्वावर (Pilot Project) सन २०१०-२०११ करीता राबविण्याबाबत...**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
**शासन निर्णय, क्र. खाकवा-२००९/प्र.क्र.७६-अ/का.३**
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
**दिनांक : ३१ मार्च, २०१०.**

**वाचा:** १) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. खाकवा-२००४/प्र.क्र.९६/(भाग-२)/ का.८, दि.२० जुलै, २००४.
२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग,क्र. खाकवा-२००५/प्र.क्र.८०/का.८, दि.२४ जुन, २००५.
३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.खाकवा-२००४/प्र.क्र.९६/(भाग-२)/ का.८, दि. ९ ऑगस्ट, २००५.
४) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. खाकवा-२००७/प्र.क्र.८२/ का.८, दि. १९ मे, २००६.
५) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. याचिका-२००७/प्र.क्र.१४६/का-८, दि.२४ मार्च २००८.
६) शासन परिपत्रक, आदिवासी विकास विभाग, क्र. याचिका-२००७/प्र.क्र.१४६/का-८, दि. ३० मे,२००८.
७) शासंन निर्णय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक-साविव्य-१००९/ प्र.क्र.३१८ / नापू-२८ दिनांक ४ मार्च, २०१०.

**प्रस्तावना** : आदिवासी भागात सावकार व व्यापाऱ्यांकडून होणाऱ्या आदिवासी लोकांची पिळवणूक थांबविण्यासाठी महाराष्ट्र आदिवासी आर्थिक स्थिती (सुधारणा) अधिनियम, १९७६ पारित करुन सावकारी बंद करण्यात आली. तसेच पावसाळयात जून ते सप्टेंबर या कालावधीत रोजगार उपलब्ध होत नाही म्हणून आदिवासी उपयोजना क्षेत्रातील आदिवासी (अल्प भूधारक, भूमिहीन व शेतमजूर) यांना आर्थिक अडचण निर्माण होऊ नये तसेच या कालावधीत (जून ते सप्टेंबर या कालावधीत) त्यांची उपासमार होऊ नये म्हणून सन १९७८ पासून खावटी कर्ज योजना सुरु करण्यात आली आहे. सदर योजना महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक यांचेमार्फत राबविली जात आहे. यासाठी निधी शासनाकडून आदिवासी विकास महामंडळास उपलब्ध करुन दिला जात आहे.

खावटी कर्ज योजना अंमलबजावणीबाबत मा. उच्च न्यायालय, नागपुर खंडपीठ येथे दाखल असलेल्या रिट याचिकेच्या सुनावणी दरम्यान मा. उच्च न्यायालय, नागपुर खंडपीठ यांनी सदर योजनेतील अन्नधान्य, कडधान्य, खाद्यतेल, साखर इत्यादी सार्वजनिक वितरण व्यवस्थेमार्फत ( PDS ) राबविण्यास सहमती दर्शविलेली आहे. त्या अनुषंगाने सन २०१०-११ या आर्थिक वर्षाकरीता खावटी कर्ज योजना सार्वजनिक वितरण

व्यवस्थेमार्फत **धारणी (मेळघाट), एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्पामध्ये प्रायोगिक तत्वावर (Pilot Project) राबविण्याबाबतचा** प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय</u> :-** सन २०१०-११ या आर्थिक वर्षाकरीता खावटी कर्ज योजना सार्वजनिक वितरण व्यवस्थेमार्फत **धारणी (मेळघाट), एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्पामध्ये प्रायोगिक तत्वावर (Pilot Project) राबविण्याचा** निर्णय शासनाने घेतला आहे. सदर योजना राबविण्यासाठी खालीलप्रमाणे कार्यपध्दती विहित करण्यात येत आहे :-

१) सन २०१०-११ या आर्थिक वर्षाकरीता खावटी कर्ज योजना सार्वजनिक वितरण व्यवस्थेमार्फत धारणी (मेळघाट), एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्पामध्ये प्रायोगिक तत्वावर (Pilot Project) राबविण्यात येईल. या योजनेंतर्गत दारिद्रय रेषखालील कुटूंबे (गरोदर स्त्रीया व स्तनदा माता असलेली कुटुंबांना प्राधान्य राहील), तसेच ग्रेड-३ व ग्रेड-४ च्या मुलांची कुटूंबे या आदिवासी कुटुंबांना सदर योजनेचा लाभ मे पासून ऑक्टोबर पर्यंत सहा महिन्याकरिता देय राहील.

२) सदर योजना **एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धारणी** या आदिवासी उप योजना क्षेत्रासाठी लागू राहील. या योजनेसाठी अल्प भूधारक शेतकरी व भूमिहिन शेतमजूर पात्र राहतील व त्यांना धान्य व इतर वस्तू त्यांचेकडे उपलब्ध असलेल्या कार्डाच्या आधारावर अनुज्ञेय असतील व त्यांच्याकडील कार्डाप्रमाणे एकूण वजन व धान्याच्या दरानूसार रक्कम आदिवासी विकास विभाग त्यांच्यावतीने अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांना अदा करेल.

३) ज्या आदिवासी कुटूंबात ग्रेड- ३ व ग्रेड-४ ची मुले आहेत, किंवा आदिम जमाती मध्ये आहेत असे कुटूंब जरी दारिद्रय रेषेच्या वर असले तरी त्यांना सदरहू योजनेचा लाभ देण्यात यावा. या कुटूंबाना मिळणारे धान्य व इतर अनुज्ञेय वस्तू APL दराने देण्यात यावे.

४) या योजनेंतर्गत वाटप करावयाच्या शिधावस्तु या सार्वजनिक वितरण व्यवस्थेतंर्गत दारिद्रय रेषेखालील, तसेच दारिद्रय रेषेवरील ग्रेड-३ व ग्रेड-४ च्या कुटुंबांना वितरित होणा-या गहू, तांदुळ, तुरडाळ, पामतेल व साखर या ५ शिधावस्तुंच्या स्वस्त धान्य दुकानातील किरकोळ विक्री किंमतीनूसार व खालील दर्शविलेल्या तक्त्यामधील परिमाणानूसार लाभार्थ्यांना वितरित करण्यात यावा. वितरित केलेल्या शिधावस्तुंची किंमत शासन निर्णय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, क्रमांक-साविव्य-१००९/ प्र.क्र.३१८/ नापू-२८ दिनांक ४ मार्च, २०१० व त्यात भविष्यात होणारा बदल याप्रमाणे लावण्यात येईल. तसेच केरोसीन देखील निर्धारित प्रमाणानूसार वितरीत करण्यात येईल.

| अ.क्र | युनिटची संख्या (कुटुंबांतील व्यक्तींची संख्या) | सार्वजनिक वितरण व्यवस्थेतंर्गत वितरित करण्यात येणा-या शिधा वस्तुंच्या वाटपाचे परिमाण ( दरमहा) कर्ज स्वरुपात. | | |
|---|---|---|---|---|
| | | वस्तूचे नाव | बीपीएल | एपीएल |
| १ | ४ | १) गहू<br>२) तांदूळ | ३५ किलो प्रतिकार्ड (गहू + तांदूळ ) | १५ किलो प्रतिकार्ड (गहू + तांदूळ ) |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | ३) साखर | ५०० ग्रॅम प्रति माणशी | २ किलो प्रति कार्ड |
| | | ४) तुरडाळ | १ किलो प्रति कार्ड | १ किलो प्रति कार्ड |
| | | ५) पामतेल | १ लिटर प्रति कार्ड | १ लिटर प्रति कार्ड |
| | | ६) केरोसीन | निर्धारित प्रमाणानूसार | |
| २ | ५ ते ८ | १) गहू<br>२) तांदूळ | ३५ किलो प्रतिकार्ड (गहू + तांदूळ ) | १५ किलो प्रतिकार्ड (गहू + तांदूळ ) |
| | | ३) साखर | ५०० ग्रॅम प्रति माणशी | २ किलो प्रतिकार्ड |
| | | ४) तुरडाळ | १ किलो प्रतिकार्ड | १ किलो प्रतिकार्ड |
| | | ५) पामतेल | १ लिटर प्रतिकार्ड | १ लिटर प्रतिकार्ड |
| | | ६) केरोसीन | निर्धारित प्रमाणानूसार | |
| ३ | ८ पेक्षा जास्त | १) गहू<br>२) तांदूळ | ३५ किलो प्रतिकार्ड (गहू + तांदूळ ) | १५ किलो प्रतिकार्ड (गहू + तांदूळ ) |
| | | ३) साखर | ५०० ग्रॅम प्रति माणशी | २ किलो प्रतिकार्ड |
| | | ४) तुरडाळ | १ किलो प्रतिकार्ड | १ किलो प्रतिकार्ड |
| | | ५) पामतेल | १ लिटर प्रतिकार्ड | १ लिटर प्रतिकार्ड |
| | | ६) केरोसीन | निर्धारित प्रमाणानूसार | |

५. या योजनेंतर्गत पात्र आदिवासी कुटुंबांची लाभार्थी निवड प्रक्रिया १५ एप्रिल, २०१० पर्यंत पुर्ण करण्यात यावी. लाभार्थींची यादी तयार करीत असताना मागील वर्षी ए.पी.एल. खाली लाभ देण्यात आलेल्या ग्रेड-३ व ग्रेड-४ च्या मुलांच्या कुटुंब लाभार्थ्यांचा आढावा घेण्यात यावा. ग्रेड-३ व ग्रेड-४ च्या मुलांच्या कुटुंबांना या योजनेचा लाभ देण्यात यावा.

६. सदर लाभार्थींची निवड प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धारणी यांनी संबंधित एकात्मिक बालविकास अधिकारी, प्रादेशिक व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, तहसिलदार तसेच संबंधित आरोग्य अधिकारी, प्राथमिक आरोग्य केंद्र यांच्या मदतीने करण्यात यावी. यादी तयार करताना प्राथमिक आरोग्य केंद्राचे आरोग्य अधिकारी व एकात्मिक बाल विकास अधिकारी यांचेकडून कुपोषित किंवा ग्रेड-२, ग्रेड-३ व ग्रेड-४ मधील मुले, गरोदर स्त्रीया व स्तनदा माता असलेल्या कुटूंबांची यादी घ्यावी. या यादीतून दारिद्रय रेषेखालील कुटुंबांना प्रथम निवडावे व त्यांना निवड यादीत प्राधान्य दयावे. जर काही आदिम जमातीची कुटुंबे दारिद्रय रेषेखालील यादीत नसतील व त्यांच्याकडे बीपीएलचे कार्ड नसेल तरीही या कुटुंबांमध्ये कुपोषित मुले किंवा गरोदर स्त्रीया किंवा स्तनदा माता असतील तर त्यांना एपीएल दराने धान्य पुरवठा करण्यात यावा.

७. गरीब आदिवासींकरीता अन्न सुरक्षा योजना या योजनेतंर्गत लाभार्थ्यांची निवड करित असतांना खालील बाबीचे काटेकोरपणे पालन करावे :-

(अ) ज्या कुटुंबांमध्ये कुपोषणग्रस्त ग्रेड-३ व ग्रेड-४ ची मुले आहेत किंवा गरोदर स्त्रीया व स्तनदा माता आहेत अशा कुटुंबाची निवड सर्व प्रथम करावी. त्यासाठी बीपीएल रेशन कार्डची अट विचारात

घेण्यात यावी. परंतु ज्या कुटुंबांकडे बीपीएल रेशनकार्ड नसेल तर त्यांना एपीएल कार्डच्या दरानुसार धान्य देण्यात यावे.

(ब) कुपोषणग्रस्त लाभार्थ्यांनतर दारिद्रय रेषेखालील आदिवासी परित्यक्त्या, निराधार वृध्द व आदिम जमातींच्या लाभार्थ्यांचो निवड करावी. जर यांच्याकडे बीपीएल रेशनकार्ड नसेल तर त्यांना एपीएल कार्डच्या दरानुसार धान्य पुरवठा करण्यात यावे.

(क) वरील अ व ब नुसार निवड झाल्यानंतर दारिद्रय रेषेखालील ज्या आदिवासी कुटुंबांना मागील वर्षात सदर योजनेचा लाभ मिळाला नाही, त्यांची निवड करावी. हा निकष अ व ब येथील लाभार्थ्यांसाठी लागू राहणार नाही.

(ड) सद्य:स्थितीत कुपोषणाची स्थिती लक्षात घेता अमरावती जिल्हयातील मेळघाट भागातील चिखलदरा व धारणी तालुक्यातीलच आदिवासी लाभार्थ्यांना या योजनेचा लाभ प्राधान्याने देण्यात यावा. लाभार्थीची निवड ग्रामपंचायतीच्या दारिद्रय रेषेखालील लाभार्थींच्या यादीतून करावी. यासाठी संबंधित ग्रामपंचायतीचे ग्रामसेवक व अंगणवाडी कार्यकर्ती यांची मदत घ्यावी.

या योजनेसाठी लाभार्थी निवड करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती स्थापन करण्यात यावी :-

| | | | |
|---|---|---|---|
| १) | तहसिलदार | - | अध्यक्ष |
| २) | एकात्मिक बाल विकास अधिकारी | - | सदस्य |
| ३) | आरोग्य अधिकारी, प्राथमिक आरोग्य अधिकारी | - | सदस्य |
| ४) | गट विकास अधिकारी | - | सदस्य |
| ५) | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प | - | सदस्य सचिव. |

८. या योजनेतंर्गत अंतिम निवड केलेल्या पात्र आदिवासी कुटुंबांच्या लाभार्थ्यांची गाव/तालुका निहाय यादी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धारणी यांनी एप्रिल महिना अखेरपर्यन्त जिल्हा पुरवठा अधिकारी, अमरावती यांना पाठवतील व संबंधित तहसिलदार यांना लाभार्थ्यांच्या गांवनिहाय (बीपीएल/एपीएल वर्गवारीनुसार) यादीची एक प्रत देतील. संबंधित तहसिलदार हे लाभार्थी कोणत्या शिधावाटप केंद्रातून धान्य उचलतील याचे आदेश बीपीएल / एपीएल कुटुंबनिहाय निर्गमित करतील व धान्य वाटपासंबंधी आदेश शिधावाटप दुकानदारांना देतील.

९. सदर कुटंबांना सार्वजनिक वितरण व्यवस्थेमार्फत वितरित करण्यात येणा-या शिधावस्तुंसाठी येणारा मासिक खर्च भागविण्यासाठी आगाऊ रक्कम (एकूण खर्चाच्या १००% एवढी) म्हणून प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धारणी हे जिल्हा पुरवठा अधिकारी, अमरावती यांना अदा करतील.

१०. या योजनेंतर्गत पात्र आदिवासी कुटुंबांना वितरित करावयाच्या शिधावस्तुंचे वाटप मे, २०१० ते ऑक्टोबर, २०१० या ६ महिन्यांच्या कालावधीसाठी करण्यात येईल. सदर शिधावस्तुंचे वितरण अपवादात्मक परिस्थिती वगळून प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत परिच्छेद-५ मध्ये नमूद केल्यानुसार स्वस्त धान्य दुकानांमार्फत करण्यात येईल. परंतु ऐन पावसाळयात काही गावांचा संपर्क तुटल्यास अशा गावातील लाभार्थ्यांना व्दार वितरण

प्रणालीमार्फत शिधावस्तूंचे वाटप करण्यात यावे. पात्र लाभार्थ्यांना शिधावस्तुंचे वाटप प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत परिच्छेद-५ मध्ये नमूद केल्यानुसार होत असल्याची देखरेख प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धारणी यांनी करावी.

११. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धारणी हे रोख अनुदान स्वरुपात लाभ द्यावयाच्या रक्कमेचे वाटप मे ते ऑक्टोबर महिन्याच्या १० तारखेस रेखांकित नसलेल्या धनादेशाव्दारे आदिवासी कुटुंब लाभार्थींच्या नावे वितरीत करतील. अनुदान स्वरुपात लाभार्थ्यांना खालीलप्रमाणे लाभ देण्यात यावा.

| अ.क्र | युनिटची संख्या (कुटुंबांतील व्यक्तींची संख्या) | रोख स्वरुपात द्यावयाचे अनुदान (रुपयात)<br>सदर अनुदान हे सार्वजनिक वितरण प्रणाली व्दारे पुरविण्यात येत नसलेल्या मीठ, हळद, मिरची पावडर व इतर आवश्यक वस्तू खरेदी करण्यासाठी लाभार्थ्यांना खालीलप्रमाणे वितरित करावे. |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | ४ | रु. १००/- प्रति महिना सहा महिन्याकरीता. |
| २ | ५ ते ८ | रु. १५०/- प्रति महिना सहा महिन्याकरीता. |
| ३ | ८ पेक्षा जास्त | रु. २००/- प्रति महिना सहा महिन्याकरीता. |

१२. सादर केलेल्या पात्र आदिवासी कुटुंबांच्या यादीप्रमाणे प्रत्येक कुटुंबाला वाटप केलेल्या शिधावस्तुंची नोंद लाभार्थ्यांच्या यादीप्रमाणे स्वस्त धान्य दुकानात नोंदवहीमध्ये नोंद घेण्यात येईल. याबाबतचा नमुना **परिशिष्ट "अ "** सोबत जोडला आहे. प्रत्यक्षात वाटप केलेल्या व नोंदवहीमध्ये नोंद घेतलेल्या शिधावस्तुंच्या किंमतीनुसार खर्चाची विवरणपत्रे संबंधीत स्वस्त धान्य दुकानदार संबंधित तहसिलदार, जिल्हा पुरवठा अधिकारी आणि संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांना प्रत्येक महिन्याच्या २० तारखेपर्यंत सादर करतील. खर्चाबाबतचा नमुना **परिशिष्ट "ब "** सोबत जोडला आहे. ज्या कुटुंबांमध्ये कुपोषणग्रस्त ग्रेड-३ व ग्रेड-४ ची मुले आहेत, ती कुटुंबे दारिद्रय रेषेच्या वर असतील तरी त्या कुटुंबांना या योजनेचा लाभ दयावयाचा असल्याने त्याना देण्यात येणा-या शिधावस्तूंचे दर कार्डधारकांच्या कार्डाच्या दर्जाप्रमाणे आकारण्यात यावे.

१३. स्वस्त धान्य दुकानातून वितरित केलेल्या शिधावस्तु यांच्या एकूण किंमतीच्या रक्कमेचा तपशिल संबंधित तहसिलदार यांच्यामार्फत जिल्हा पुरवठा अधिकारी, अमरावती यांना सादर करतील. जिल्हा पुरवठा अधिकारी, अमरावती हे या योजनेचा लेखा स्वतंत्रपणे तयार करतील व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धारणी यांना याबाबतचा तपशिल पाठवतील.

१४. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धारणी यांनी जिल्हा पुरवठा अधिकारी, अमरावती यांच्याकडून सादर केलेल्या तपशिलाच्या आधारे व प्रत्यक्ष झालेल्या शिधावस्तुंच्या वितरणाबाबतची छाननी करुन झालेल्या कमी/अधिक खर्चाची तपासणी करुन उर्वरित निधी व पुढच्या महिन्यासाठी आवश्यक तेवढा अग्रिम निधी जिल्हा पुरवठा अधिकारी, अमरावती यांना अदा करतील.

१५. या योजनेतंगत निवड केलेल्या पात्र लाभार्थ्यांना विहित मुदतीत शिधावस्तूंचे वितरण होईल यासाठी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धारणी यांनी जिल्हा पुरवठा अधिकारी, अमरावती व

संबंधित तहसिलदार यांचेशी समन्वय ठेवावा व लाभार्थी या योजनेच्या लाभापासून वंचित राहणार नाहित याची दक्षता घ्यावी.

१६. या योजनेंतर्गत आदिवासी कुटुंबाना ३० टक्के अनुदान व ७० टक्के कर्ज या स्वरूपात वितरीत करण्यात यावे. ७० टक्के कर्जाची वसुली ५ समान हप्त्यात करण्यात यावी. याकरीता योग्य प्रमाणात हप्ते बांधुन द्यावे. कर्ज वसुली नोव्हेंबर पासून करण्यात यावी.

१७. खावटी कर्ज योजनेसाठी आवश्यक असलेला निधी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना उपलब्ध करुन देण्यात येईल. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धारणी यांना सदरच्या योजनेसाठी आवश्यक लागणारा निधी आगाऊ स्वरूपात आयुक्त आदिवासी विकास, नाशिक यांनी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धारणी याना सदरचा निधी लाभार्थी संख्येनुसार व केलेल्या मागणीनूसार वितरित करावा.

१८. यावरील खर्च "मागणी क्र.टी-५, मुख्य लेखाशिर्ष-२४२५-सहकार-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना(०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०१)(११) खावटी कर्ज वाटप (२४२५ १४९३) ३३-अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली सन २०१०-११ या वर्षात केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

१९. सदरचा शासन निर्णय अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांच्या सहमतीने व त्यांच्या मान्यते नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

२०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या बेबसाइटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेताक २०१००४०११९१८२७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

**( सो. ना. बागुल )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
अप्पर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग (वने) मंत्रालय, मुंबई.
अप्पर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग (महसूल) मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय मुंबई.

Khavati- 2010-11.lwp

प्रधान सचिव, (सहकार) सहकार व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
महासंचालक, आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
सहकार आयुक्त, पुणे.
विभागीय आयुक्त. अमरावती
जिल्हाधिकारी, अमरावती
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक.
सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास.
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद अमरावती
जिल्हा पुरवठा अधिकारी, अमरावती
सर्व तहसिलदार, पंचायत समिती, अमरावती जिल्हा.
सर्व गट विकास अधिकारी अमरावती जिल्हा.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, धारणी.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
वित्त विभाग (अर्थसंकल्प-१७/व्यय-१४/अर्थसंकल्प-३/अर्थोपाय/कोषा प्रशासन-५),मंत्रालय, मुंबई-३२.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
संचालक ( लेखा व कोषागारे ), संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, मुंबई.
महाव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक / नागपूर.
सर्व प्रादेशिक व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ.
मा.मंत्री / मा.राज्य मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
सर्व सह सचिव / उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व कार्यासने, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती (का.३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई..

# परिशिष्ट "अ"

शासन निर्णय क्र.खाकवा-२००९/प्र.क्र.७६-अ/का.३, दि. ३१ मार्च, २०१० चे परिशिष्ट. आदिवासी कुटूंबांना वितरित केलेल्या शिधावस्तुंची नोंद ठेवणे.

महिना :

| अ.क्र. | लाभार्थ्याचे नांव | बीपीएल/ एपीएल यादी नं. | बीपीएल/ एपीएल कार्ड नं. | वितरणासाठी अनुज्ञेय शिधावस्तु | | | | | | प्रत्यक्ष वितरित केलेल्या शिधावस्तुंचा तपशिल | | | | | | लाभार्थ्यांची सही/ अंगठा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | गहू (कि.ग्रॅ) | तांदुळ (कि.ग्रॅ) | साखर (कि.ग्रॅ) | तूरडाळ (कि.ग्रॅ) | पामतेल (लिटर) | केरोसिन (लिटर) | गहू (कि.ग्रॅ) | तांदुळ (कि.ग्रॅ) | साखर (कि.ग्रॅ) | तूरडाळ (कि.ग्रॅ) | पामतेल (लिटर) | केरोसिन (लिटर) | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ | १७ |
| | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | |

सही

शिधावाटप नियंत्रक अधिकारी

## परिशिष्ट "ब "

शासन निर्णय क्र.खाकवा-२००९/प्र.क्र.७६-अ /का.३, दि. ३१ मार्च, २०१० चे परिशिष्ट. आदिवासी कुटूंबांना प्रत्यक्ष वितरित केलेल्या शिधावस्तुंच्या खर्चाचे विवरण.

महिना :

| अ.क्र. | एकूण तालुका/ जिल्हा निहाय लाभार्थी संख्या | प्रत्यक्ष वितरित केलेल्या शिधावस्तुंच्या खर्चाचा तपशिल | | | | | | | | | | | | एकुण खर्च | | उपलब्ध करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | गहू (कि.ग्रॅ) | एकूण किंमत | तांदुळ (कि.ग्रॅ) | एकूण किंमत | साखर (कि.ग्रॅ) | एकूण किंमत | तूरडाळ (कि.ग्रॅ) | एकूण किंमत | पामतेल (लिटर) | एकूण किंमत | केरोसिन (लिटर) | एकूण किंमत | एकूण खर्च | उपलब्ध निधी | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ | १७ |
| | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | |

सही

शिधावाटप नियंत्रक अधिकारी

Khavati- 2010-11.lwp

एच-०१५-५अ.